**नगर दिवाणी व सत्र न्यायालय, दिंडोशी, गोरेगाव, मुंबई येथे नवीन कोर्ट क्र.१५ व १६ ची उभारणी करण्यासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-०११८/१६२/प्र.क्र.४२/का-११.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०५ जून, २०१८.

संदर्भ :- **१. मा. उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्र. बी(डब्ल्यू) ६००१- २००१, ३३८८/४२३३५, दि. २१/१२/२०१७.**
**२. प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. देखभाल विभाग/पीजे/२३५५/२०१७, दि.०५/१०/२०१७.**

**प्रस्तावना :**

नगर दिवाणी व सत्र न्यायालय, दिंडोशी, गोरेगाव, मुंबई येथे नवीन कोर्ट क्र.१५ व १६ ची उभारणी करण्यासाठी येणाऱ्या अनुक्रमे रू.२०,८४,८९७/- व रु.१५,४९,४०१/- इतक्या रकमांची अंदाजपत्रके मा. उच्च न्यायालयाने संदर्भिय अनुक्रमांक १ येथील पत्रान्वये प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केली होती. त्यानुसार सदर खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

नगर दिवाणी व सत्र न्यायालय, दिंडोशी, गोरेगाव, मुंबई येथे नवीन कोर्ट क्र.१५ व १६ ची उभारणी करण्यासाठी येणाऱ्या एकूण रु.३४,३७,८५०/-(अक्षरी रूपये चौतीस लाख सदोतीस हजार आठशे पन्नास फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास/खर्चास खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | प्रस्तावित केलेली अंदाजित रक्कम रुपये | सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणित केलेली रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १) | नवीन कोर्ट क्र.१५ | २०,८४,८९७ | १९,७२,२०० |
| २) | नवीन कोर्ट क्र.१६ | १५,४९,४०१ | १४,६५,६५० |
| एकूण | | ३६,३४,२९८ | ३४,३७,८५० |

२. यावरील खर्च मागणी क्र.जे-१, २०१४ न्यायदान, १०५, दिवाणी व सत्र न्यायालये, (०१)मुंबई शहर दिवाणी व सत्र न्यायाधीश, (०१)(०१) मुंबई शहर दिवाणी व सत्र न्यायाधीश (अनिवार्य)

(२०१४ ०१६३) या लेखाशीर्षामधून २७- लहान बांधकामे या उद्दिष्टातून भागविण्यात यावा. सदर प्रकरणी निधीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. सदर प्रकरणी प्रचलित कार्यपध्दतीचा अवलंब करुन ई-निविदा प्रक्रिया सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर विहीत नियमानुसार अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी. तसेच, वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील नियम क्र. क्र.२७(२)(अ) मधील तरतूदींचेही पालन करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौ.सं.क्र.५५/इमा-२, दि.२७/०१/२०१८ अन्वये तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२ दि.१७.४.२०१५,मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८,भाग-पहिला,उप विभाग- तीन,अनुक्रमांक ४,परिच्छेद क्र.२७(२)(अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६०६१५५६३२१४१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Santosh Sampatti Navagire

Digitally signed by Santosh Sampatti Navagire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Santosh Sampatti Navagire
Date: 2018.06.06 16:00:13 +05'30'

**( सं.सं.नवगिरे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
२. प्रबंधक(निरीक्षणे-२), उच्च न्यायालय(अ.शा), मुंबई.
३. प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई.
४. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
७. विधि व न्याय विभाग, कार्या-२३ व २४.
८. निवडनस्ती/ कार्या-११.

*********************